**कोव्हीड-१९ या आजारामुळे मृत पावलेल्या व्यक्तीच्या नजिकच्या नातेवाईकास सानुग्रह सहाय्य मंजूर करण्यासाठी खर्च करण्यास मंजूरी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन ज्ञापन क्र. :- सीएलएस-२०२१/प्र.क्र.३२५/म-३,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २९ मार्च, २०२२

वाचा :-१) शासन निर्णय,महसूल व वन विभाग, क्र.सीएलएस-२०२१/प्र.क्र.२५४/म-३, दि.२६.११.२०२१
२) मा.मुख्यमंत्री सचिवालयाचे पत्र क्र.मुमंनि-१०२१/कोविड-१९/प्र.क्र.९४/मवव विभाग/२०२१, दि. २८.१२.२०२१

**ज्ञापन :-**

महसूल व वन विभागाच्या दिनांक २६.११.२०२१ च्या शासन निर्णयाद्वारे कार्यान्वित करण्यात आलेल्या कोव्हिड-१९ या आजारामुळे निधन पावलेल्या व्यक्तींच्या निकट नातेवाईकास रु. ५०,०००/- प्रत्येकी सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यासाठीच्या योजनेच्या अंमलबजावणीसाठी तात्पुरत्या स्वरुपात मुख्यमंत्री सहाय्यता निधी कोविड-१९ (खाते क्र.३९२३९५९१७२०) या खात्यातून प्रतिपुर्तीच्या अधीन राहून विभागाच्या इंडियन बँक, नरिमन पॉईट खाते क्र.६८७४८६१७५६ या खात्यामध्ये रु. १५०,००,००,०००/- (रु. एकशे पन्नास कोटी) इतकी रक्कम RTGS द्वारे परस्पर वर्ग करण्यात आली आहे. आता या योजनेसाठी अर्थसंकल्पिय तरतूद उपलब्ध झाल्याने या ज्ञापनाद्वारे रु. १५०,००,००,०००/- (रु. एकशे पन्नास कोटी) इतकी रक्कम कोषागारातून आंहरित करुन मुख्यमंत्री सहाय्यता निधी कोव्हिड-१९ या खात्यामध्ये प्रतिपूर्ती करण्याकरिता वर्ग करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. देयक मंजूर झाल्यानंतर देयकाची रक्कम ईसीएसव्दारे या योजनेच्या अंमलबजावणीसाठी उघडण्यात आलेल्या खालील तपशीलाच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावी.

| बँकेचे नाव | शाखा | खातेदाराचे नाव | खाते क्र. | IFSC Code |
|---|---|---|---|---|
| स्टेट बँक ऑफ इंडिया | मुंबई मुख्य शाखा, फोर्ट, मुंबई- ४०० ००१. | मुख्यमंत्री सहायता निधी- कोविड-१९ | ३९२३९५९१७२० | SBIN०००३०० |

३. या योजनेवरील होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय्य, १०१ अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) रोख भत्ता, मृत व्यक्तींच्या कुटूंबियांना सहाय्य जखमींना मदत (अनिवार्य),

३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ ०१५५) या लेखाशीर्षाखाली पुर्नविनियोजनाव्दारे उपलब्ध होणाऱ्या निधीमधून भागविण्यात यावा.

४. याबाबतचे देयके अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांना सादर करण्याकरिता, लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, आहरण व संवितरण अधिकारी आणि वित्तीय सल्लागार व सह सचिव यांना नियंत्रक, अधिकारी, म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०३२९१२३९५६७६१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2022.03.30 12:01:12 +05'30'

**( संजय औ. धारूरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. लेखाधिकारी (आव्यप्र-०६), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी (म-११), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
३. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
४. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई,
५. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
६. मा.मुख्यमंत्री सचिवालय, (निधी कक्ष) मंत्रालय, मुंबई
७. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
८. निवड नस्ती (कार्यासन/ म-३).